**महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर या संस्थेकरीता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरीता ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) अंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : महाज्यो-२०२५/प्र.क्र.३६/संस्था**
मोती महल, २ रा मजला, १९५,
जे. टाटा रोड, चर्चगेट, मुंबई - ४०० ०२०
दिनांक : ११ जून, २०२५.

**संदर्भ :-** व्यवस्थापकीय संचालक, महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर यांचे दि.०१.०४.२०२५ रोजीचे पत्र.

**शासन ज्ञापन :-**

महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर या संस्थेस सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात २२२५ एफ ४९७ या लेखाशीर्षतंर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाकरीता रू.८९,७०,००,०००/- (अक्षरी रुपये एकोणनव्वद कोटी सत्तर लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या ज्ञापनान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू निधी खर्च करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाज्योती, नागपूर हे "नियंत्रक अधिकारी" राहतील. तसेच, सदरची रक्कम आहरित करण्यासाठी प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण प्रादेशिक विभाग, नागपूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. याबाबतचा खर्च मागणी क्र. झेडजी-३, २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२- आर्थिक विकास, ०१- विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास प्रवर्ग कल्याण, (०१) (०९) महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), (२२२५ एफ ४९७), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली करण्यात यावा. सदर शासन ज्ञापनान्वये वितरीत करण्यात येणारे सहायक अनुदान (वेतनेत्तर) हे सशर्त सहायक अनुदान आहे.

४. वित्तीय नियमावली व महाराष्ट्र अर्थ नियमावली पुस्तिकानुसार वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर निधी खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) वेळोवेळी महालेखापाल, शासन व संबंधितांना सादर करण्याची जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक, महाज्योती, नागपूर यांची राहील.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०६१११७५५०१११३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2025.06.11 17:56:05 +05'30'

**(दिनेश चव्हाण)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

व्यवस्थापकीय संचालक, महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर.

**प्रत,**

१. मा. मंत्री, इ. मा. ब. क. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक
८. प्रादेशिक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण प्रादेशिक विभाग, नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-५), मंत्रालय,मुंबई
१०. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/ कार्यासन-१४१३), मंत्रालय, मुंबई.
११. उप सचिव (अर्थसंकल्प) / कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इ.मा.ब.क.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (योजना-५)